**मा.मुंबई उच्च न्यायालयाच्या मा. न्यायमुर्तींची शासकीय वाहने निर्लेखित करणेबाबतच्या वित्तीय अधिकारात सुधारणा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्र. :- वाहन ६०१८/३५६/प्र.क्र. २९/का.४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
**दिनांक :- ०७ डिसेंबर, २०१८.**

संदर्भ : प्र.प्रबंधक, मुळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र.P/SC/२०१८/४४६-४४६-A&४४६-B, दि. २८.३.२०१८, क्र. १०६६, दि.६.९.२०१८ व क्र.११७४, दि.६.१०.२०१८.

**प्रस्तावना :-**

वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-१, उपविभाग २ मधील अ.क्र. १९- क, नियम क्र.६९ शासकीय वाहन निरुपयोगी ठरविण्यास मंजूरीचे प्राधिकार नमूद करण्यात आले आहेत. त्यानुसार शासकीय वाहनाने २,४०,००० किमी धावल्याचे अंतर पूर्ण केल्यास किंवा वाहन खरेदीच्या दिवसापासून १० वर्षाचा कालावधी यापैकी जे नंतर येईल त्यानुसार शासकीय वाहन निरुपयोगी ठरविण्याची तरतूद आहे.

सदर वित्तीय मर्यादा मुंबई उच्च न्यायालयाच्या मा.न्यायमुर्तींच्या वाहनांकरीता वाहनाने ८०,००० कि.मी. धावल्याचे अंतर किंवा वाहन खरेदीच्या दिवसापासून ५ वर्षे कालावधी यापैकी जे अगोदर होईल ते, यानुसार सुधारीत करण्याचा उच्च न्यायालयाचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

वित्त विभागाच्या मान्यतेनुसार विभागप्रमुख म्हणून उच्च न्यायालय, मुंबई येथील महाप्रबंधक यांना या शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्टामध्ये दर्शविल्याप्रमाणे व त्यात दर्शविलेल्या विहित अटी आणि शर्तींच्या तसेच विहित वित्तीय मर्यादेच्या अधीन राहून वित्तीय अधिकार प्रदान करण्यास शासन मंजूरी देत आहे. या शासन निर्णयाद्वारे प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तींचा वापर हा विविध वित्तीय प्रकाशनांमध्ये अंतर्भूत असलेल्या नियम आणि विनियम यामधील अटींच्या व शर्तींच्या अधीन तसेच शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या कार्यकारी आदेशांच्या अनुपालनाच्या अधीन त्याचप्रमाणे खालील अटींच्या अधीन राहून करण्यात यावा.

२. या वित्तीय अधिकारांचा वापर करून मंजूरी प्रदान करताना ज्या प्रकरणी विशिष्ट मानके (स्टँडर्ड) अथवा विशिष्ट सुत्र विहित केलेले असेल, अशा प्रकरणी विहित मानकांचे/ सुत्रांचे अनुकरण करण्यात यावे.

३. या वित्तीय अधिकारांचा वापर करून मंजूरी आदेश निर्गमित करताना सक्षम प्राधिकाऱ्याने सदर मंजूरी आदेशाची प्रत इतर सर्व संबंधित अधिकाऱ्यांप्रमाणेच संबंधित लेखापरीक्षा अधिकाऱ्याला व वित्त विभागाला (विनियम शाखा व व्यय ५ कार्यासन) पाठवावी. अशा मंजूरी आदेशामध्ये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग १, उपविभाग २ मधील संबंधित वित्तीय शक्तींचा अनुक्रमांक, नियम क्रमांक तसेच सदर शासन निर्णयाचा क्रमांक, दिनांक व त्यासोबतच्या परिशिष्टातील वित्तीय शक्तींचा न चुकता स्पष्ट उल्लेख करावा.

४. या शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्टातील वित्तीय शक्ती, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-१, उपविभाग २ मधील अ.क्र. १९- क, नियम क्र.६९ द्वारा प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तींचा एक भाग म्हणून समजण्यात यावा. ज्यावेळी उपविभाग २ चे प्रकाशन छापले जाईल, त्यावेळी त्यात या शक्तीचा अंतर्भाव करण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय, वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. अनौ.सं.क्र.७९७/२०१८/व्यय-५, दि. १६/१०/२०१८ अन्वये त्या विभागाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२१०११००१४६०१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Sanjeev R Keluskar

Digitally signed by Sanjeev R Keluskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4a521517a0d3fba83ff4473cb0d448a75f9b7f83cba41836833b60c93758c804, cn=Sanjeev R Keluskar
Date: 2018.12.10 11:07:36 +05'30'

**( संजीव केळूसकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**सहपत्र :- "परिशिष्ट अ"**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई.
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा, विधानमंडळ, मुंबई.
५. मा. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई
६. प्रबंधक (प्रशासन), उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ, नागपूर.
७. प्रबंधक (प्रशासन), उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ, औरंगाबाद.
८. प्रबंधक (वित्त व अर्थसंकल्प), अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई.
९. महालेखापाल - १ (लेखा परीक्षा/लेखाअनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई.

१०.महालेखापाल - २ (लेखा परीक्षा/लेखाअनुज्ञेयता) महाराष्ट्र, नागपूर.

११.वरिष्ठ कोषागार अधिकारी, नागपूर.

१२.वरिष्ठ कोषागार अधिकारी, औरंगाबाद.

१३.वित्त विभाग व्यय ५ / विनियम मंत्रालय, मुंबई.

१४.विधि व न्याय विभाग, कार्यासन २३, २४, २५, मंत्रालय, मुंबई ३२.

१५.निवड नस्ती.

शासन निर्णय क्र.: वाहन ६०१८/३५६/प्र.क्र.२९/का.४, दि ०७ डिसेंबर,२०१८ सोबतचे

"परिशिष्ट अ"

## वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग दोन
## विधि व न्याय विभागाला / कार्यालयाला महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, १९६५ अंतर्गत नियमाखाली प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार

| अ. क्र. | महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, १९६५ चा नियम क्रमांक | शक्तीचे वर्णन | अधिकारांचा वापर करण्यास सक्षम प्राधिकारी | प्रदान केलेल्या अधिकारांची मर्यादा | अटी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १९-क | ६९ | शासकीय वाहन निरुपयोगी ठरविण्यास मंजूरी देणे. | महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई. | पूर्ण अधिकार | १) निरनिराळया वाहनाचे आयुष्य खालील अटीवरुन ठरविण्यात यावे.<br>धावल्याचे अंतर १ लक्ष किलोमीटर्स०मध्ये आणि वाहने वापरण्याचा कालावधी पाच वर्षे यापैकी जे अगोदर पूर्ण होईल ते.<br>२) वरील अट पूर्ण करण्यापूर्वीच एखादे वाहन (अपघात किंवा मोठया प्रमाणावरील बिघाड) निरुपयोगी ठरवावयाचे झाल्यास कार्यकारी अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग / कार्यकारी अभियंता (यांत्रिकी), सार्वजनिक बांधकाम विभाग/कृषी अभियंता, कृषी विभाग, शासकीय परिवहन सेवा किंवा प्रादेशिक परिवहन अधिकारी, यांचे कडून "वाहन दुरुस्त करुन यापुढे उपयोगात आणणे आर्थिकदृष्टया किफायतशीर राहणार नाही" असे प्रमाणपत्र मिळाल्यावरच ते वाहन निरुपयोगी ठरविण्यात यावे. |